मा. उच्च न्यायालय मुंबई यांचे आदेशानुसार दि. २९.८.२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या व दि. २७.७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये पुनर्गठित केलेल्या समितीच्या संरचनेत बदल करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**महसुल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः-आरपीए-३४१५/प्र.क्र.६८/र-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक :- २० फेब्रुवारी, २०१७

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक आरपीए/३४१५/प्र.क्र.६८/र-४,दिनांक २९.८.२०१५

२) शासन निर्णय क्रमांक आरपीए/३४१५/प्र.क्र.६८/र-४,दिनांक २७.७.२०१६

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनाशी निगडीत रिट याचिका क्रमांक ७७९६/२०१३ व जनहित याचिका क्रमांक १७१/२०१४ मध्ये दिलेल्या आदेशांस अनुसरुन शासनाने पुणे जिल्ह्यातील पुनर्वसन कामकाजांतर्गत पर्यायी जमीन वाटपाची सद्यस्थिती, पर्यायी जमीन वाटपात उद्भवलेल्या अडीअडचणी व पर्यायी जमीन वाटप अपुर्ण असल्यास त्याबाबतची कारणमिमांसा व उपाययोजना सुचविण्यासाठी उपरोक्त संदर्भाधीन दि. २९.८.२०१५ च्या शासन निर्णयान्वये द्विसदस्यीय समिती नियुक्त केली होती. सदर समितीचे सचिव, मदत व पुनर्वसन हे अध्यक्ष तर विभागीय आयुक्त, कोकण विभाग हे सदस्य होते. तद्नंतर संदर्भाधीन दि. २७.७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये मूळ समितीचे पुनर्गठण करण्यात आले होते. सदर पुनर्गठित समितीमध्ये श्रीमती मालिनी शंकर, अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) हया अध्यक्षा तर श्री. गोविंदराज, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई हे सदस्य होते.

२. आता सदर समितीच्या अध्यक्षा श्रीमती मालिनी शंकर, अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांची बदली झाल्याने सदर समितीचे पुनर्गठण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुणे जिल्ह्यातील पुनर्वसन कामकाजांतर्गत पर्यायी जमीन वाटपाची सद्यस्थिती, पर्यायी जमीन वाटपात उद्भवलेल्या अडीअडचणी व पर्यायी जमीन वाटप अपुर्ण असल्यास त्याबाबतची कारणमिमांसा व उपाययोजना सुचविण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये गठित केलेल्या व संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये पुनर्गठित केलेल्या समितीचे पुढीलप्रमाणे पुनश्च पुनर्गठण करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | श्रीमती मेधा गाडगीळ, अपर मुख्य सचिव, मदत व पुनर्वसन विभाग | अध्यक्षा |
| २. | श्री. के.एच. गोविंदराज, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |

२. समितीची कार्यकक्षा व कार्यपध्दती दिनांक २९.८.२०१५ च्या उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयामध्ये विहित करण्यात आली आहे, त्याप्रमाणेच राहील.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२०१६२३२११३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2017.02.20 16:25:45 +05'30'

**( प्रवीण मुंढे )**

कार्यासन अधिकारी, महसुल व वन विभाग

**प्रत :-**

१. मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे स्वीय सहाय्यक
४. अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक
५. श्री. के.एच. गोविंदराज, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
६. प्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई
७. विभागीय आयुक्त, पुणे विभाग
८. जिल्हाधिकारी, पुणे
९. उप सचिव (पुनर्वसन), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अप्पर जिल्हाधिकारी, पुणे
११. जिल्हा पुनर्वसन अधिकारी, पुणे
१२. निवड नस्ती, कार्यासन र-४, म. व व. वि., मंत्रालय, मुंबई